

कै. गणपतराव बापुराव कोळेकर

मु. लाट, ता. शिरोळ, जि. सोलापूर.

---

## आमची इतर प्रकाशने

- अश्व परिक्षा इ. स. १९३७
- अश्व परिक्षा दुसरी आवृत्ति इ. स. १९९२
- धनगर समाजाची गोत्रे इ. स. १९८१।
- लाट दर्शन इ. स. १९८५

# धनगर समाज प्राचीन इतिहास व गोत्र

–गणपतराव बापूराव कोळेकर





प्रकाशक :
**श्री. शिवाजी गणपतराव कोळेकर**
मु. लाटवाडी, पो. अबदुल लाट,
ता. शिरोळ जि. कोल्हापूर.



**श्री. आर. ए. पाटील**
५६ब, आसरा कॉलनी,
होटगी रोड, सोलापूर.



लेखक :
**श्री. गणपतराव बापूराव कोळेकर**
मु. लाटवाडी, पो. अबदुल लाट,
ता. शिरोळ, जि. कोल्हापूर.



प्रथमावृत्ती इ. सन १९९२



मुद्रक :
भि. रा. जानकर
४९७, साखर पेठ,
सोलापूर–४१३ ००५



किंमत : ५–०० रुपये

# धनगर समाजाचा वेदकाला पासूनचा इतिहास, वंश, कुळी, गोत्र व प्रवर

**धनगर समाज प्राचीन माहिती**

सूर्यवंशात मूळ पुरुष आदिनारायण म्हणजे विष्णू - विष्णूपासून ब्रम्हदेव व ब्रम्हदेवाचा पुत्र मरिची, मरिचीचा पुत्र कश्यप सर्व जीवांचा आदि कश्यपपासून कश्यपापासून देव, दैत्य सर्व लोक व प्राणिमात्र त्यांची उत्पत्ती झाली. कश्यपाच्या ३६ राण्या होत्या. त्यांचेपासून सर्व चराचर विश्वाची उत्पत्ती झाली. कश्यपाच्या ३६ राण्यापैकी २८ वी राणी सुंदरा ही हटकर म्हणजे धनगर जातीचा होती. (मूळ संभ) सुंदराचा बाप खरऋषी माता अधृती व मुलगा माधवी नावाचा होता ३६ मूळ ऋषी पैकी ताप ऋषी धनगर जातीचा व मणीमहंत हटकर जातीचा होता (मूळ स्तंभ)

**वेद दर्शन –**

उत्तर ध्रुवावरुन दक्षिणेंकडे येताना आर्य लोकानी सैबेरीयामध्ये उरल पर्वत व अलताही प्रदेशामध्ये बराच काळ वस्ती केली. त्या प्रदेशात मेंढ्या वन्य प्राणी होत्या. त्यांना आर्य लोकानी माणसाळविले. प्राणी शास्त्राचा तसा एक सिद्धांत आहे की ज्या प्रदेशात एखाद्या प्राण्याची रानटी जात आढळते त्या त्या प्रदेशातच त्या प्राण्यांना मानसाळवीले जाते. या आर्य लोकांची एक टोळी सुमारे ५००० वर्षापूर्वी भारतात आली. त्यांनी मेंढ्या भारतात आणल्या. त्यापूर्वी मेंढ्या भारतात असलेला उल्लेख कोठे आढळत नाही. (भारतीय संस्कृती कोष भाग १ पान ४७२) भारतात आर्य संस्कृतीचा प्रवेश होण्यापूर्वी असूर, दैत्य, दानव नाग असे अनेक संस्कृतीचे समाज नांदत होते. आर्य व द्रविड हे भारतातले दोन समाज सोडून त्यांच्याही पुर्वी भारतात असलेल्या किंवा बाहेरच्या प्रदेशातून भारतात स्थाईक झालेल्या जमातीना वन्य जमाती किंवा आदिवासी असे म्हणतात. कांही विद्‌वान अभ्यासक म्हणतात की, धनगर लोक हे भारतातील आदिवासी किंवा वन्य जमातीचे वंशज आहेत. परंतु भारतीय संस्कृति कोषामध्ये ज्या आदिवासी किंवा वन्य जमाती दिल्या आहेत त्यामध्ये धनगर जमातीचे नांव नाही. तसेच धनगर समाजाचे जे पोटभेद दिले आहेत. त्यामध्ये आदिवासी व वन्य जमातीचे नाव नाही.

काही अभ्यासक म्हणतात, की धनगर समाज हा द्रविड वंशातील आहे. परंतू द्रविड वंशातील पोटभेद तामीळ, तेलगू, कन्नड, मल्याळी, तुळु असे आहेत त्यात धनगर समाज नाही. धनगर समाजामध्ये अहीर असल किंवा मराठा वनगी

बरगेबंद किंवा मेटकरी, डंगे, गडगे, गवळी हटकर किंवा झेंडे, होळकर, कंबर, क्षित्री, खिलारी किंवा भिलारी खुठे किंवा खुटेकर, कुकटेकर, लाड मेंढे, म्हसकर सनगर, शेगर, शिरोटचा, उटेकर असे पोट भेद आहेत. त्यामध्ये आदीवासी वन्य जमाती किंवा द्रविड वंशाचे नांव नाही.

**वेदात लिहीले आहे –**

"उन्नी सुत्रेण कवयो वयंति.

याचा अर्थ विद्वान लोक लोकरीचे कपडे स्वतः तयार करुन वापरतात.

प्रत्याधिर्वं ज्ञानामश्व हयोरथायामे
ऋषिः सयोमनदियी विप्रस्य यावयत्ससखः /
आधीसमानाया : पति शुचदायाश्य शुचसमच
वासोवायो : वीनामासांसि मर्मंजात् /

सुक्त सवि ऋ. मंडल १०, सूची २६

याचा अर्थ ऋषि यज्ञांचा प्रसार करणारे आहेत. रथासंबंधी विद्या जाणणारे आहेत. असे हे ऋषी मनुष्याचे हित करणारे आहेत. व विद्वानाचे दुःखाचा नाश करणारे मित्र आहेत. पिले देणाऱ्या शुद्ध मेंढ्याचे पालक आहेत. मेंढ्याचे लोकरीचे वस्त्र बनविणारे व वस्त्राचे परिशालन करणारे आहेत.

ऋग्वेद कालात ऋषिमुनी आपले आश्रमात मेंढ्या पाळत असत. व त्यांचे शिष्य मेंढ्यांना चारणेस नेत असत.

जोतिष्य शास्त्रात मेष राशीला प्रमुख स्थान असून त्यावरुन भविष्य वर्तविले जाते. ऋग्वेद मंडल १०–२६

भूतलावर प्रथम झाडांचे सालीचा उपयोग कपडे म्हणून केला जात असे. त्यानंतर एका धनगराने टकळीवर लोकरीचे सूत काढून कांबळा तयार केला.

संस्कृत भाषेमध्ये धांग असा शब्द आहे. धांग याचा अर्थ डोंगर पर्वत असा आहे. लढवय्या जातीतील कांही लोक अडचणीचे वेळी आपली मेंढरे गायी व इतर जनावरे घेऊन जंगलात राहत असत, त्यांनाच धनगर म्हणतात.

आर्य लोक भारतात आले. त्यांनी मेंढ्या भारतात पाच हजार वर्षापूर्वी आणल्या. व पाळल्या. ते लोक म्हणजे आर्य लोक धनगर आहेत.



आर्य लोकाप्रमाणें धनगर लोकात महालय व श्राद्धविधी आहे. (भा. सांस्कृतीक कोष) (यजुर्वेद अध्याय १९ ऋचा ३६–३७)

शेंडी राखणें हे आर्यत्वाचे मुख्य चिन्ह आहे. धनगर लोकामध्ये शेंडी राखणेंची वहिवाट आहे. (ऋग्वेद मंडल १ तृप्त ७५ ऋचा १७ खंड ९ पान २८२) ऋजाश्व नावाचा एक ऋषी मेंढ्या राखत होता. त्याची मुलेही तोच उद्योग करीत होते. (ऋग्वेद मं. ; ऋचा १ल६/११७ भा. स. कोष. खंड ८ पान २६)

आर्य लोक आपले लहान मुलाचे कान टोचत असत. ( ऋग्वेद मं. १ सुक्त ८९ ) धनगर लोकामध्येही लहान मुलाचे कान टोचणेंची पद्धत आहे.

तरंत राजा याची राणी शशीयशी हिने शावाश्व ऋषीला शतावधी बकरी दान दिली. (ऋग्वेद मं. ५ सुक्त ६१ ऋचा ५)

राजा पौरकुत याने पषध काण्व ऋषिला १०० बकरी दान दिली.
(ऋ. म. ८ सुक्त ५६ सु. ३)

बकरी दान देणारे राजे व दान घेणारे ऋषी मेषपाल होते.

लोकरी वस्त्रे परिधान करणारे मेघोद्रेद्धक मस्तदेव परुष्णी म्हणजे रावी नदीकाठी गर्जना करीत आहे. (ऋ. म. ५ सुक्त ५२ रुचा ९) याचा अर्थ रावी नदी काठी राहणारे मेषपाल मरुत देवाला लोकरीचा कांगला अर्पण करीत असत व मस्तदेव पाऊस पाडत असत. यावरुनच धनगराने कांबळा झाडला म्हणजे पाऊस पडत असे ही म्हण अस्तीत्वात आले असावी.

**पंचोदन बकरा म्हणजे पंचकल्याणी बकरा –**

पंचकल्याणी बकरा म्हणजे बोकड एक रंगी असून त्याचे चारी पाय पांढरे असतात. डोकीवर पांढरा नाम असतो. अंगावर कोठेतरी पांढरा मोठा पांढरा ठिपका असतो. असा बोकड देवाला बळी दिला असता. बळी देणाराचे पुत्र, पौत्र व पिता पाप रहीत होतात, बलीदान करणारा स्वर्गाचा स्वामी होतो. असा बळी दिलेला बोकड पुण्यवाना आश्रम जागी जातो. (अर्थववेद मंडल ऋचा ५)

अंगीरथ ऋषीने असा बोकड बळी दिला. म्हणून त्याला स्वर्गाचे ज्ञान झाले या सूक्ताधारेच पंचकल्याणी बोकड किंवा मेंढा देवाला बळी दिला, असता देव अधिक संतुष्ट होतो असे धनगर लोक समजतात.

**यजुर्वेद अध्याय २ सुक्त २१. –**

हेवरुणा रोगादीमने व दोषीत जलापासून आम्हांला मुक्त कर. हे ऋणा गाय ज्याप्रमाणें अवध्य आहे त्याप्रमाणें अन्य पशुदेखील हननीय नाहीत. तरीही आमचे हातून पापाचरण घडले असेल तर त्याबद्दल त्यापासून आम्हांला मुक्त कर जल आणि औषधे आम्हांला परोपकारक ठरोत.

**यजुर्वेद अध्याय ८ सुक्त १२ –**

यजुर्वेदांच्या मंत्रानी संकल्प केला गेला. ऋग्वेदाचे मंत्रानी देवतांची स्तुती केली आणि सामवेदांचे मंत्रानी विस्तार केला.

**यजुर्वेद अध्याय १३ ऋचा ४४ –**

हे अग्ने त्वष्टाच्या अनुग्रहाने स्वतःचे लोकरीत इतरांची शरीरे अच्छादित करणारी व वरुणाला प्रिय वाटणारी कोणत्याही ठिकाणी सुखाने राहणारी उपयुक्त मौलीक मेंढीला तू मारु नकोस.

ऋचा ४५ अग्नीरुपी प्रजापती पासून आणि पृथ्वीवरच्या तिव्र उष्णतेपासून भूलोकी जन्मलेल्या बोकडाला हे अग्ने तुझ्या रागापासून दूर ठेव.
ऋचा ५१, अग्नीरुपी प्रजापतीच्या क्रोधापासून बोकड उत्पन्न झाला. जन्मतः त्याने आपले पित्याला पाहीले त्या बोकडांचे योगाने देवांनी यज्ञ करुन स्वर्गाला जात.
सुक्त ४६ ते ५० इतर प्राण्यांना मारु नये म्हणून आहेत.

**सामवेद गायनाचा वेद आहे –**

**अथर्ववेद –** या वेदातील अनेक ऋचा ऋग्वेदातील आहेत. या वेदात समाविष्ठ असलेले कांही विषय ज्ञानेश्वरीमध्ये आलेले आहेत. अथर्ववेद भगवत्‌गीतेचे उगम स्थान आहे. आयुष्यवृद्धी रोग निवारण विविध औषधी वनस्पती त्याचे उपयोग परिणामासह दिलेला परिचय कृमिनाश विनाश वगैरे विषयाचे स्पष्टीकरण करणारी सुक्ते या वेदात समाविष्ट झालेली आहे.

अथर्ववेद तृतिय कांड सुक्त २१ ऋचा ८ आकाशात गोचर होणारे यमाचे दूत पापी लोकांना दंड करणारे धर्मशील लोकावर कृपा करणारे आहेत. ते यज्ञ कामातील पाप व पुण्य अलग करणारे आहेत. हा यज्ञ वृष्टी करणारा असून आमची अभिलाषा पूर्ण करतो. या ठिकाणी बळी दिलेला मेंढा कधी क्षय पावत नाही जो



यजमान असा मेंढा दान करतो. तो स्वर्गाचा अधिकारी होतो. पांढऱ्या पायाचे चार पाय आणि नाभीच्या ठिकाणी हवी ठेवून अर्पण केला जातो. तो दाता पित्र लोकांस जातो. सुर्य लोकात प्रवेश करितो. यज्ञात बळी दिलेली पांढऱ्या पायाची मेंढी क्षिण होत नाही. कारण प्रजापती तिला धारण करतो आणि यजमानाला इच्छित फल प्रदान करतो. पृथ्वी आणि आंतरिक्ष या कामातला मेंढीमुळे मिळालेले फळ गृहण करतात.

**अथर्ववेदातील विषय –**

अथर्ववेद संकारिकाना दिलासा देणारा आहे. यामध्ये स्वतः सर्व बाजूनी रक्षण कसे करता येईल वैभव कसे वृद्धींगत करता येईल. त्याच प्रमाणे राजा राज्य युद्ध राजधर्म समाज प्रबोधन वगैरे विषयांचा विचार आहे.

१) अध्यात्म २) ब्रम्हचर्य ३) गृहस्थाधर्म ४) वानप्रस्थ ५) सन्यास ६) आर्थवन ७) औषधी ८) रोग निवारण ९) कृमीनाशन १०) विषनाश ११) अरिष्टनाश १२) राज्यशासन १३) स्वसाधना १४) संग्राम १५) शत्रुनाश १६) यासीधारण १७) पापनाश १८) अन्न ११) संपत्ती २०) आधिदेवत २१) यज्ञ २२) काळ २३) पशुसंपत्ती २४) व्यापार,

वरील विषयामध्ये तत्वज्ञान विषयक मंत्र आहेत. त्याचप्रमाणें अभिचार मंत्रतंत्र वशीकरण मंत्र जादू टोना. गंडदोरे क्रियासाधने वगैरे विषयांचाही विचार आहे. या विषयाला जे मंत्र आहेत. ते सर्व सिद्ध मंत्र आहेत. चांगले परिणामकारक आहेत. अर्थात या मंत्रासाठी ज्या क्रिया सांगितल्या आहेत. त्यांची माहिती पूर्णपणे करुन घेतल्या शिवाय त्यांच्या वाटेत जाऊ नये. औषधी वनस्पती रोग त्यांचे स्वरुप आणि परिणाम याचांही उल्लेख या वेदात आहे शस्त्रास्त्रे वापरणे आणि अन्य शस्त्राचा नाश करणे याबद्दल क्रिया आणि मंत्र या दोहोचाही समावेश या वेदात आहे.

धनगर समाजाची लोकसंख्या महाराष्ट्रात अंदाज १ कोटी असून त्यापैकी मेष पालन करणारे लोक५०,००००० आहेत. तसेच भारतातही त्या प्रमाणात धनगर लोक आहेत. धनगर लोकामध्ये शेळ्यामेंढ्या पाळणे, शेती, व्यापार व सैनिकी पेशाचे सरकारी नोकर कारखानदारी व मजूरी करणारे असे लोक आहेत. काही विद्वान अभ्यासकांनी धनगर लोकांना वन्य जमातीतील आदीवासी द्रविडचा वंशाचे म्हटले आहे. त्या अभ्यासकांना शेळ्या, मेंढ्या चारणे करीता रानावनात फिरतात. तेवढेच धनगर लोक दिसतात. वर सांगीतलेले इतर उद्योग धंदे करणारे

धनगर लोकांकडे लक्ष न देता त्यांनी वरील विधाने केली आहेत. धनगर लोक पूर्वीच्या काळी विद्वान होते. त्यांनी काही उपनिषेधही लिहीलेली आहेत. त्यावेळी बरेचऋषीमुनी धनगर होते. त्यांचे आश्रमात राहून धनगर व इतर लोकांची मुले शिक्षण घेत असत. कालांतराने आश्रम बंद झाले. व शिक्षणही बंद झाले. शेळ्या, मेंढ्या पाळणारे लोकांना आपल्या शेळ्या, मेंढ्या चारणेकरीता व त्यांचे रक्षणा करीता रात्रंदिवस रानावनात रहात असलेनें लोक नागरी जीवन व त्यांचे रक्षणा– करीता रात्रंदिवस रानावनात रहात असलेने ते लोक नागरी जीवन व आचारा पासून लांब राहीले. त्यांना विदवान अभ्यासकानी आदीवासी व वन्यजमाती द्रवि– डीयन वंशाचे म्हंटले आहे. परंतु हे खरे नसून आर्य लोक उत्तरध्रुवाकडून दक्षिणेंकडे येताना आलप्स पर्वत व अलताई प्रदेशात बरेच दिवस राहीले. तेथे असलेले वन्य प्राणीं, मेंढ्या मानवाला आपले मांस व दुध रुपानें अन्न पुरविणारे व कातडी व लोकर रुपानें वस्त्र पुरविणारे असे बहुपयोंगी प्राणी म्हणून त्याना माणसाळून भारतात आणले. व पाळले त्या आर्य लोकाचे वंशजच धनगर हे लोक आहेत.

पाच हजार वर्षापूर्वी आर्य लोक भारतात आले. व त्यांनी वेद रचले वेदांचे आधाराने वैदीक धर्माची स्थापना केली व गोत्रेही लिहीली. लोक आपआपले गोत्राप्रमाणे धार्मीक विधी करत असत. अशी व्यवस्था पुढेही अडिच हजार वर्ष चालू होती.

**बौद्ध धर्माची स्थापना –**

इसवी सनापूर्वी ५६७ साली वैशाख शुद्ध पोर्णिमेस गौतम बुद्धाचा जन्म झाला. त्यांनी बौद्ध धर्माची स्थापना केली, इ. सनापूर्वी ५०० सालापासून बौद्ध धर्माचा प्रसार झाला. अनेक राजे व सरदार लोकांनी बोद्ध धर्माचा स्विकार केला. राजा अशोक याने भारतात व सभोवतालाचे अनेक देशात बौद्ध धर्माचा प्रसार केला. बौद्ध धर्मात वर्ण व्यवस्था नव्हती. त्यामुळे कोणीही कोणालाही आपली मुलगी लग्नात द्यावी किंवा कोणाचीही मुलगी आपण करावी अशी प्रथा पडली. त्यामुळे गोत्र व प्रवर यांचा विसर पडला. अशी सुमारे चौदाशे वर्षे गेली.

**वैदिक धर्माची पुर्नरचना –**

मलबार प्रांतात कालाडी येथे इसवी सन ७८८ साली आद्य शंकराचार्याचा जन्म झाला. त्यांनी श्री भगवत गितेचे आधाराने पूर्व मिमांसा व उत्तर मिमांसा हे ग्रंथ लिहीले.



उत्तर मिमांसा मधील काही तत्वे व बौद्ध धर्मातील काही तत्वे घेऊन श्री. शंकराचार्यानी वैदिक हिंदू धर्माची पुर्नरचना केली. हिंदू धर्माची पुर्नरचना करताच शंकराचार्यांना पवार उर्फ परमार. प्रतिहार, चव्हाण व साळोखे राजानी पूर्ण आश्रय दिला.

हिंदू धर्माची पुर्नरचना होताच दहावे शतकात पुन: पूर्व धर्म परिस्थिती जाणवू लागली. व विसरुन गेलेले गोत्र प्रवरांदिकांची आवश्यकता भासु लागली. ज्यांना आपली गोत्र मिळाली नाहीत असे लोक आपले विवाह संबंध आप– आपल्या कुळी पाहून जमवू लागले.

ब्राम्हण, रजपुत, मराठे व धनगर यांचे गोत्र कुळी, वंश व प्रवर समान असून ती आर्यानीच लिहिलेली आहेत. म्हणजे हे वरील सर्व समाज आर्य वंशातीलच आहेत.

तसेच मराठे व धनगर यांची बरीचशी आडनावे एकच आहेत. धनगर समाजाला मराठा समाजाचे एक अंग समजले जाते. त्याचे मधील धार्मीक विधीही सारखेच आहेत. राजस्थानात राष्ट्रकूट या नांवाचा अपभ्रंश होऊन राठोड हे नांव उत्पन्न झाले आहे. ( भा. स. कोष खंड ८ पान १७८ ) धनगर समाजात "मराठा" नांवाचा एक पोटभेद आहे.

**कुळी, वंश, गोत्र व प्रवर–**

भारतात क्षत्रिय पेशाच्या तीन प्रमुख जाती आहेत. १) रजपुत २) मराठा ३) धनगर जात, मुळात या तिन्ही जाती एकच आहेत. त्यामध्ये रोटी व बेटी व्यवहारही होत असत रजपूतानी उत्तर भारतात, मराठे यानी महाराष्ट्रात व धनगरानी कर्नाटकात आपली राज्ये स्थापली होती, रजपूतामध्ये ३६ कुळी आहेत. मराठ्यामध्ये मुख्य ३६ असून उपकोळी ६० आहेत. अशा मराठ्यामध्ये एकूण ९६ कुळी आहेत. व धनगरामध्ये ३२ कुळी आहेत.

**गोत्र व प्रवर**

गोत्र म्हणजे वेद रचनेंत आले त्यावेळेपासून आज सुमारे पाच हजार वर्षा– पासून आर्य लोकांनी ठेवलेली आपली वंशोउत्पत्तीची आठवण आहे.

गोत्र ऋषी म्हणजे आपले कुळीचे मूळ पुरुषानी ज्याचे जवळ शिक्षण घेतले असा मूळ ऋषि.

प्रवर ऋषि म्हणजे ज्यानी ऋग्वेदातील सुत्र रचली व त्या सुत्राने अग्नीची स्तुती केली असे पुर्वज.

वैदिक धर्मीय हिंदूमध्ये लग्न, श्राद्ध, पक्ष, उत्तर क्रिया वगैरे धर्मकृत्यात प्रारंभी गोत्र व प्रवर यांचा उच्चार करावा लागतो.

एका वंशात विवाह प्रसंग होतात. पण एकाच गोत्रांत व कुळांत विवाह होऊ शकत नाही. ( स्कंद पुराणा उचसधि )

उपगोत्र म्हणजे ज्यांचे ऋषि गोत्र विसरलेले आहेत त्या गोत्राचे ठिकाणी आपले गोत्रातील दुसरे एखादे प्रसिद्ध पुरुषाचे नांव दिले जाते असे गोत्र

**कूळ –**

एका कुटुंबातील कर्तापुरुष त्याचे वडील, त्याची मुले अशा तीन पिड्या नांदत त्याला कुळ असे म्हटले जाते.

**गोत्र–**

प्राचीन काळी संपत्ति गाईच्या स्वरुपात मोजली जाई, म्हणून एका कुळात राहाणाऱ्या सर्व लोकांच्या गाई एकत्र असत. त्याला गोत्र असे नांव होते. नंतर ते कूळाचे गोत्र असे समजले जाऊ लागले.

गौण अर्थाने गोत्र शब्द कुटुंबातील एखाद्या शूर विद्वान किंवा श्रीमंत पुरुषाला लावतात. नंतर त्याच्या कूळाला त्या पुरुषावरुन नाव मिळते. त्याला लौकिक गोत्र असे नांव असून ते क्षत्रियामध्ये असते.

ज्या कुळाचे प्रवर समान नाहीत त्या कुळात विवाह व्हावा असे गौतम सूत्रींत म्हटले आहे. सूत्रकाळी चांद्रयाण किंवा कृच्छ प्रायश्चित केले की सगोत्र विवाहाचा दोष जात असे.

लग्न कार्यात कुलगोत्राचा उपयोग करतात-

**आपले गोत्र पाहणेंची रीतः–**

धनगर समाजातील गोत्र कुळी आडनांवे व पडनांवे वंश व प्रवर यांचा तक्ता पुढे दिलेला आहे. त्यात आपले आडनांव मिळाले नाही तर आपले कुळीशी ज्या कुळीचा भाऊपणा येतो व विवाह संबंध होत नाही अशा कुळीचे आडनावा– वरुन आपले गोत्र निश्चीत करावे. आपले कुळीशी भाऊपणा असणाऱ्या कुळी समाजातील वृद्ध लोकाना माहित असतात,

पुढे दिलेली गोत्रे ही धनगर समाजातील सर्व पोट जातीसह एकच आहेत. मूळचा धनगर समाज एकच असून पोट जाती कालांतराने पडल्या आहेत.

| अ. नं. | मुख्य कुळी | आडनावे व उपनावे | गुळ गोत्र | वंश | ऋषी गोत्र | प्रवर |
|---|---|---|---|---|---|---|
| १) | खरात | धायगुडे, पांढरे, सूळ. बोरवर. अमाने, ढाके, पालवे टेळे, कोळपे घागरे. पिंजारे. रायजादे, कावळे, भडके. घोडके, वेळे, तरडे, ढवळे, तामखडे, रत्नपारखे, मळगे, झुरळे, वांदे, गेटे, व्हरकाटे, लांडगे, तोंडगे, पटकारे, भोपळे, थोरवाले, सुरसूळे, पुणेंकर, गुलदवडे, खराटे, सातकुळे, वनगे पळसगावडे, चुतकले, गोलारी. | परिहार | अग्नीवश | पुंडरीक | ३ मिळाली नाही |
| २) | लवटे | नरुटे. बडगर, मानें, मरगळे, हजारे, शेंडगे, बावरे, डबळे, पोकळे, गरवाट, पिसाळ. कासुगडे, नेमाणें, धुलवडे, भानवसे, क्षीरसागर. शेमडे, चोरे, हलगे, करगळ, किन्वे, गावडे, बिंदुगडे, थिटे, काकडे, गास्के, मारगुडे, रोडे, झिवळ' रेवे, बडरे, वडरे, दरगुडे, बागनवर, झाडगर, बरले. निगुंडे, बधनवर, मिसाळ' बिरजे, तांदळे. | सोळंकी | अग्नी वंश | भारद्वाज | अंगिरस वार्हस्पत्य भारद्वाज |
| ३) | थोरात | अनावसे, महानवर, तानाळ, खटके, वायकुळे, पावणे, सातपुते, लोखडे, शिंगवटे, देवकर, कालगुडे, धकर, बरवे, खमगळ, सुपकर, सुपणें. लटे, पांढरमिसे, सुमनें, पाटोळे, लोखंडे. | गललोळ | सुर्यवश | कश्यप | कश्यप वत्स बैधव |

| क्र नं | मुख्य कुळी | आडनावे व उपनावे | कुळ गोत्र | वंश | ऋषी गोत्र | प्रवर |
|---|---|---|---|---|---|---|
| ४) | कोळेकर | मुरडे, सोसे, दाइंगडे, हममखोरे, बोटघाटे, दीडवाग आगलावे, करपे, बनसोडे, करपे, बनसोडे, चवधारे, आनावळे, नासके, गाडवे, राऊत, कुडलीक, भागवत, ( रामाचा मुलगा कुश यांचा वंश ) | कान्वाह | सुर्यवंश | मानव | चावन आल्पवन जमदाग्नी |
| ५) | शिंदे | झुंजे, काळजाते, कांडुरे, हांडवरे, खडके, बेंदरे, ढोणें, बिचकुले, हराळे, सुटे | परीहार | अग्नीवंश | पुंडलिक | ३ मिळाली नाहीत |
| ६) | हाके | मदने, खरेजे, गोपणे, दहीभाते, घुटकडे, हांडे, दोलवडे, लुबाळे, इबडे, झालगर, मेटकरी, पिसे, बिजुगडे, हिसे लांडे, बने, बारगाले, वरगे, | यादव | चंद्रवंश | कौडिन्य | कौडिन्स अंगिरग माईस्पख्य |
| ७) | स्वार | सुडनवर, हेगडकर, बलार, बरगें, डापटवर, गेळे, दिंडे, शिरगिरे, गोयकर, साठें | गहलोल | सुर्यवंश | कश्यप | कश्यप वत्सनेधु नैध्व |
| ८) | सोलनकर | पारकर, खंडेकर, वाघमोडे, हिरवे इक्कर, ठवरे, ओगरे, निटवे, इंगळे, डोईफोडे तांबे, ( बोकड न खाणारे ) सीद, पाडुळे, हागरे, गंवड, घोगरे, धुपे, सरजे, गाडेकर, कोळसे, होड ढमढेरे, वीरकर. | यादव | चंद्रवंश | कौडीन्य | अगिरस कौंडिन्स महैसात्य |

| अ. न | मुख्य कुळ | आडनावे व उपनावे | कुळगोत्र | वंश | ऋषी गोत्र | प्रवर |
|---|---|---|---|---|---|---|
| ९ | देवकते | अर्जुन, गोरड, व्हनमाने, वलेकर, रुपनवर, बरकडे, मेटकरी, ढेरे, तांबे, (बोकड खाणारे) तळे, डोंगरे, बगडे, भामटे, उतरे, कोले, झाडे, खिलारी, दांबे, अगुणे दोरवे, हनुमाने, सुडळक, निगडे | चौहान | अग्निवंश | वत्स | भार्गव आम्तवंश आर्य च्यवन जामदग्य |
| १० | वाकसे | उसके, मसके, चोरमले, मिरसट, बंगाले, कुऱ्हाडे, मुगुटराव | गहलोल | सूर्यवंशी | कश्यय | कायश्व वत्स नैध्रुव |
| ११ | सरगर | साडनवर, फोंडे, गिपरे कटरे, मलगोंडे, गडवे, मेटकरी, कुसपे, नांबळकर, सुंपे खुपकर, पिंजारी, तुरबारे. | चांहन | अग्निवंश | वत्स | भार्गव ववन वाप्नवन आर्मं जामदग्न |
| १२ | सरक | झरक, तारनवर, शेळके, जिटे, लकडे, चोपडे, भडके, पेरवले, हराळे, विरजे, पिसाळ, शेलार | सोलंकी | अग्निवंश | भारद्वाज | आंगिदस भारस्पत्व भारद्वाज |
| १३ | हालनवर | बीवकर दिलगुडे, हुलगुंडे दुधे सरवदे, येळे, सिद्धगुरु, कोडलकर | गहलोल | सूर्यवंश | कश्यप | काष्यप वत्स नैधृव |

| अ. न | मुख्य कुळ | आडनावे व उपनावे | कुळगोत्र | वंश | ऋषी गोत्र | प्रवर |
|---|---|---|---|---|---|---|
| १४ | कोकरे | हाजगे, होगले, अस्वले, पिंगळे, सोनटक्के, कऱ्हाडे, माळवदे. राचकर, देवपुंजे, सोंडगे, भुसारे, राजगर, गोरे, वीरकर, लांभाटे, हुलकर. | राठोड | सूर्यवंश | गौतम | आंगीरस आयास गौतम |
| १५ | जानकर | कारंडे, राऊत, मोटे माळे, धुले, बिडघर, वाघे, करमारे, पडळकर | गहलोल | सूर्यबंश | कश्यप | काश्यप वत्स नैधव |
| १६ | काळे | महिन, गहिने सारसे, हुवाळे, श्रीराम. गोरे, डोंबाळे, सिनगारे, घरबुडवे, दडस. नामकडे, सिंगिरे | कदम | सूर्यवंश | मानव | च्चवन आन्यवन जामदग्न |
| १७ | खवाळ | शेजाळ, दुधाळ, वाघमारे गरंडे, गलंडे, | सोलंकी | अग्निवंश | भारद्वाज | अगिरग भारस्पत्य भारद्वाज |
| १८ | येडगे | जेडगे, सन्ने, जुगदार, जोंवळे जवळगे, गरडे गलंडे, रेडके | गहलोल | सूर्यवंश | कश्यप | काष्यप वत्स नैध्व |
| १९ | ऐनवर | आईनवर, बुधनवर, डकनवर. कोयनवर, मकनवर भाडनवर | गहलोल | सूर्यवंश | कश्यप | कश्यप वत्सनेधु नैध्व |

| अ. न. | मुख्य कुळी | आडनावे व उपनावे | कुळगोत्र | वंश | ऋषी गोत्र | प्रवर |
|---|---|---|---|---|---|---|
| २० | शिंगाडे | धुरंगळे, तरडे व्हटकर, ढवण, माळवे, ( श्रृंग ऋषीचा वंश ) | शेंगर | सूर्यवंशी | गौतम | अंगिरस आयास्य गौतम |
| २१ | बुटे | ताटे, कचरे, मोरे, कुवळकुडे, बावदान, डोईफोडे, वाघ, पिसे, बिरे, दळवी, केसकर | प्रभार | अग्निवंश | वशिष्ठ | वशिष्ठ शक्ती पराशर |
| २२ | लेंगरे | पिसुंदरे किलिंदरे, वगरे, जालिंदरे. सिगारे, ( श्रृंग ऋषीचा वश ) | सेंगर | सूर्यवश | गौतम | आंगिरस आयास्य गौतम |
| २३ | आवळे | पुकाळे, यमगर. यमनवर, | गहलोल | सूर्यवंश | कश्यप | काश्यप वत्स नैधृव |
| २४ | ठोंबरे | सोंनावळे, व्हटे, काटमारे, | तवर | यदुवंश | गर्गायन | गर्ग, अंगिरस बार्हस्पत्य भारद्वाज |
| २५ | ठेंगल | सणगणे, टुले, ठेंगले, | गहलोले | सूर्यवंश | कश्यप | |
| २६ | आलदर | वलदवर. करनवर, कमाडे, डांगे, | ,, | ,, | ,, | काश्यप वत्स नैधृव |
| २७ | टकले | एरडे, तुपे, टिकले, | ,, | ,, | ,, | |
| २८ | मारकड | शिवरकर, मुटकर, | ,, | ,, | ,, | |
| २९ | दगडे | पोले, संसलाटे, | ,, | ,, | ,, | |
| ३० | मासाळ | मिसाळ, गोंनमासाळ, अमुकसिद्ध, खाजणे, साळ, भोंडगे, वळसे, पलेरी, वडेर. | सोळंकी | अग्निवंश | भारद्वाज | अंगिरस बार्हस्पत्य भारद्वाज |
| ३१ | लाकरे | बेलनवर | | | | |
| ३२ | कुलाल | बिसे, बुचटे | गहलोल | सूर्यवंश | कश्यप | काश्यप वत्स नैधृव |

**मराठी राज्यातील धनगर वीर.**

छत्रपती शिवाजी महाराज यांनी मराठी राज्याची स्थापना करणेंस सुरु-वात केंली, त्यावेळी त्यांचे सैन्यात प्रामुख्याने मावळे व हेटकरी होते. हेटकरी हटकर व झेडें धनगर हे एकच आहेत. स्वतंत्र मराठी राज्य स्थापण्यात व शिवाजीची सून ताराबाई हिने मराठी राज्याचे संरक्षण करण्यास ओरंगजेब बाद-शहा बरोबर इ. सन १६८९ पासून १७०७ पर्यंत जो दिर्घ लढा दिला त्यात मराठे व धनगर लोकच जास्त होते. त्या स्वातंत्र्याच्या लढ्यात महाराष्ट्रात राजे पांढरे शरफत मूलूख समशेरबहाद्दूर, राजे देवकाते बंडगर अमीर उल उमराव शेंडगे, चोपडे, कोळेकर, काळे, गोफणे, वाघमोडे, कोकरे, ओलेकर, धायगुंडे, शिंदे, मासाळ, हजारे, मदने, लांबहाते, खरात, शेळके, सलगर, पुणकर, पाटोळे, खताळ, माने, बुळे, फणसे, अकले, बारगल, शिंगाडे, डांगे, काकडे, गाडवे, महा-नवर, बरगे, केसकर, हाके, रुपनवर, गलांडे, गरुड, भानूसे, सोंनवळकर, जांभळे, बने, आगलावे, वाघे, वाघमारे, देसाई, देशमुख, इनामदार, मोकाशी वगैरे घराणी प्रसिद्धीत आली.

शिवाजी महाराजाचे वेळचे धनगर सरदार निंबाजी पाटोळा, दादाजी काकडे, व्यंकाजी खांडेकर, धनजी शिंगाडा, बनाजी बिरजे, येसाजी थोरात, हिरोजी शेळके, बळवंतराव देवकाते, अमदोजी पांढरे, भवाणराव देवकांते, माण-कोजी धनगर गोदाजी पांढरे, इंद्राजी गोरड, नाईकजी पांढरे वगैरे होते.

औरंगजेब बादशहाचे स्वारीचे वेळी राजाराम महाराज जिंजी येथे असता धनगर सरदाराना दिलेल्या पदव्या बंडगर – अमीर उल उमराव पांढरे – शर-मत मुलूक काकडे–दिनकरराव, वाघमोडे :– सेना बारासह श्री थोरात – दिन-करराव - पांढरे – शहाजात मुलूख – पांढरे – समशेर बाहद्दुर, महारनवर फत्तेजंग बहाद्दर, – ढोके – विश्वासराव, ढमढेरे, विठोजी सलगर असे सरदार होते. इंडीचे बंडगर देशमुख यांचे घराण्यातील स्त्रियांना पायांत सोन्याच्या साख-ळ्या घालण्याचा मान साताराचे शाहू छत्रपतींनी दिला होता, हा मान मिळव-णारी घराणी महाराष्ट्रात फार थोडी होती.

इ. सन. १७६१ चे पानिपतचे संग्रामात पुढे दिलेले मोठे धनगर सरदार होते. सुभेदार मल्हारजी होळकर, रामराव खंडोजी देवकांते, मानाजी धायगुंडे मलकोजी माने यमाजी गोफने, रंगराव शिंगाडे, विठ्ठलराव पांढरे, गंगाजी शिंगाडे यमाजी टकले, नारायणराव पांढरे, केरबा काळे, तुकोजी गाढवे, नरसिंगराव चोपडे, आनंदराव माने, शिवाजी शेळके, धावजी माने हे मोठे सरदार होते.



यापैकी पहिले तीन सोडून बाकीचे सरदार धारातिर्थी पडले. या शिवाय लहान सरदार, शिलेदार, बारगीर व पायदळचे लोक अनेक ठार झाले. व कांही जिवंत परत आले.

वरील सरदारपैकी केरबा काळे हे इचलकरंजीचे असून त्यांची पत्नी निरा-बाई सती गेली. तिचे वृंदावन इचलकरंजी येथे आहे.

इंदोरचे पहिलें तुकोजीराव यानी मल्हारराव होळकर यांचे सैन्यात असता मराठयांचा भगवा झेंडा इ.सन १७५८ साली प्रथम अटकेपार लावला होता.

इंदोरचे पहिलें तुकोजीराव होळकर यांचा चौथा मुलगा यशवंतराव याने इ. सन १८०४ मध्ये दुआबात कर्नलमॉन्सन याचा पराभव करुन इंग्रजी सैन्याची फार नासाडी केली. त्याच साली फरकाबाद येथे यशवंतरावाचा पराभव झाला. व तो पंजाबांत गेला. तेथे यशवंतरावाचे नांव ऐकून त्याचे भोवती अनेक सैनिक जमले. ते सैनिक घेऊन यशवंतरावाने कर्नल मॉन्सन याचा पराभव केला, या युद्धात इंग्रजाचें इतके नुकसान झाले की, इंग्रजानी होळकरांकडे तैनाती फौज ठेवणेचा नाद सौडून देऊन यशवंतरावा बरोबर बरोबरीचे नात्याने इ.सन १८०५ मध्ये तह केला.

अजिंक्य समजल्या गेलेल्या इंग्रज सैन्याला यशवंतरावाने दिलेला मार पाहील्यावर आपल्याला नेपोलियन बोनापार्टची आठवण होते. नेपोलियन व यश-वंतराव समकालिन होते व दोघांचा शत्रु एकच होता.

रियासतकार सरदेसाई यांनी म्हटले आहे " यशवंतराव अंतकरणाचा उदार गरिबांचा कनवाळू, हाताखालच्या लोकांना जिवापाट जपणारा स्वतःचें सुखाविषयी अत्यंत निरिच्छ पण समरांगणी कर्दनकाळ, त्याच्या तोडीचा सेना-नायक मराठ्याकडे दुसरा नव्हता. "

यशवंतरावाची बायको तुळसा ही यशवंतरावाचें हाताखाली तयार झाली. होती. यशवंतरावाचे युद्धातील डावपेच तिला समजुन आले होते. यशवंतरावाचे पश्चात तुळसा आपले सैन्य घेऊन इंग्रजाशी लढणेस निघाली पण पेशवाचे सैन्याची गाठ पडणेपूर्वी महतपूर येथे इंग्रजानी तुळसाचा पराभव केला. पण तुळ-साचे सैन्याने इंग्रजाना दिलेला मार त्याचे लक्षात राहीला. कर्नल मॉन्सनने होळकराचे सैन्यात फितूरी करुन जाव–याजाणाऱ्या नबाब गफूरखान याजकडून तुळसाला ठार मारविले पुढे गफूरखानाला या कृत्याचा पश्चाताप झाला.

यशवंतराव होळकर व तुळसा ही दोन शूर रत्ने मराठेशाहीच्या अखरच्या काठात चमकून लोप पावली. त्यानंतर लवकरच मराठेशाहीचा अंत झाला.

**आदीशाही व मराठी राज्यातील १२ राव.**

विजापूरात इब्राहीम आदिशला इ. सन १५५७ ते १५८० या बादशाहाचे कारकिर्दीत बाळकोजी, माणकोजी घायगुडे हे एका लढाईते पराक्रमी दिसल्याने त्याना बादशहाने ता. खंडाळा जि. पुणे येथे १३ गावे इनाम दिली. गावाची नांवे :– मोरवे, आवशी, पाडळी, खेड, नांदवड. आंदोरी, वाहशी, पिंपरे, पाडे–गांव, खेड बुद्रल, बोरी अशी होती. पैकी एक गाव त्यानी आपले बहिणीला दिले. या धायगुडे घराण्यात सर्जेराव, अभंगराव, आडेराव, नांदरे, तुरेवाले, झेंडेवाले, वगैरे १२ गावांची पढप्ता होत्या. पुढे इ. सन १७६१ चे पाणीपतचे लढाईत या राव धायगुंडे घराण्यांतील सर्व मारले गेले. त्यावेळी कारभारी वाघ–यांनी आपणास धायगुडे आडनांव लावून सर्व वतन आपले नावावर लावून घेतले.

वऱ्हाड प्रांतातील पैनगंगा नदीकाठचे हटकर धनगर लोकांनी इ. सन १८५७ सालचे स्वातंत्र्य युद्धात इंग्रजाचे विरुद्ध भाग घेतला होता, इंग्रजानी त्यांना माफी देणेचे अमिष दाखवून पकडून सुमारे १५० लोकाना फाशी दिली.

**लिंगायत धर्मांची स्थापना –**

कर्नाटकांत कलादगी जिल्हात कलचुरी वंशाचें राज्य होते. त्या राज्याचा प्रधान बसवेश्वर होता. बसवेश्वराचा जन्म इ. सन ११८० चे सुमारास झाला. त्यांनी लिंगायत धर्माची स्थापना केली. बसवेश्वराला धनगर जातीचे राजे, सर–दार पाळेगार देसाई व इतर धनगर लोकच जास्त अनुयायी मिळाले व त्यांनी लिंगायत धर्माचा स्विकार केला.

कर्नाटकात इ. सन १२०० चे सुमारास धनगर जातींत रेवड नांवाचा एक प्रसिद्ध संत होऊन गेला. लिंगायत धर्मातील लोकांनी विधिवत नावाचे धार्मिक ज्ञानदान करणारे एका मंदिराची स्थापना केली होती. संत रेवडने त्या विधीवंत मंदिरात प्रवेश मागितला त्यावेळी इष्टलिंग धारण करणेचा प्रश्न उद्‌भवला. लिंगायत लोक आपले गळचात इष्टलिंग धारण करीत असत. रेवडने लिंगायत धर्माचा स्विकार केला नव्हता व लिंग ही धारण केले नव्हते. म्हणून रेवडला बिधीवत मंदिरात प्रवेश मिळाला नाही. त्यावेळी अलम्‌प्रभू विधिवंत मंदिराचे अध्यक्ष होते. ते म्हणाले

" कुरुब हुट्वमुन्न कुलविल्ल गोत्र विल्लम ।
कुरुबन फल काणी बसवाण्णा ॥ "



या कानडी वाक्याचा अर्थ "धनगर उत्पन्न होणे पूर्वी जाती व गोत्रे नव्हती. धनगरांची उत्पत्ती झाले नंतर जाती व गोत्रे व्यवहारात आली. हे बस–वाण्णा आम्ही जे सर्व दिसतो ते धनगराचे फल म्हणजे वंशज आहोत." आलम–प्रभू यांचे वरील उद्‌गारावरुन पाहता हे लिंगायत लोक हे मूळचे सर्व बहूतेक धनगर असून पुढे त्यांनी लिंगायत धर्माचा स्विकार केलेचे दिसून येते.

श्री. काशिराव बापूसाहेब देशमुख रा. अमरावती प्रांत वऱ्हाड यांनी मराठी क्षत्रियांचा इतिहास या ग्रंथाचे तीन भाग लिहून इ. सन १९२९ मध्ये प्रसिद्ध केले. हे तिनही ग्रंथ त्यावेळी मध्यप्रांताचे गव्हर्नर याने इंडिया ऑफिस लायब्ररी लंडन करीता पसंत केले. त्या ग्रंथात धनगर समाजाची साडेअकरा कुल गोत्रे असलेचे माझे वाचन्यात आले. त्यातील अकरा गोत्रे मुख्य असून विवाहीत नसलेल्या स्त्रि पुरुषांचे संबंधापासून उत्पन्न झालेल्या संततीचे आर्धे गोत्र मानले आहे.

उत्तर हिंदुस्थानात डॉ. शामसिव्हंशी यांनी पी. एच. डी. पदवी मिळवीण्या करीता "हमारा समाज भारत के मेशपाल" हा प्रबंध इ. सन १९७३ मध्ये लिहीला तो इंग्लीश व हिंदी भाषेत प्रसिद्ध झाला. त्यामध्ये धनगर समाजाची मुख्य अकरा कुलगोत्रे दिली आहेत. बारावे गोत्रात इतर गोत्रे म्हटले असून त्यात कुलगोत्र नाहीत फक्त आडनांवे आहेत. यावरुन बारावे गोत्र हे विवाहीत नसलेले स्त्रि – पुरुषांचे संबंधात असून जन्मलेल्या संततीचे असावे. वरील दोन्ही आधार पाहाता धनगर समाजात मुख्य कुल गोत्रे अकरा असलेचे सिद्ध होते.

विवाहीत नसलेले स्त्रि पुरुषांचे संबंधापासून जन्मलेला संततीचे गोत्र त्या संततीचे बापाचे मानावे असे माझे वैयक्तीक मत आहे.

वरील सर्व विवेचनावरुन आलम प्रभू यांचे धनगरासंबधाचे उच्चारावरुन व ऋग्वेद व उपनिषदे यामध्ये धनगरासंबंधी आलेल्या लिखाणावरुन पहाता वेद–काला पासून धनगर समाजात गोत्रे असलेचे दिसून येते. इतकेच नव्हे तर गोत्रे मूळ धनगरांनीच लिहील्याचे दिसून येते.

**जाती कशा पडल्या**

प्राचीन काळी सुतार, लोहार, परीट. तेली, कुंभार इत्यादी स्पृश्य बलुते–दारांच्या वेगवेगळया जाती नव्हत्या. ते ही क्षत्रियच होते. ज्याला जो जमेल तो धंदा प्रत्येक इसम करीत असे. सुताराचा मुलगा सुताराचा धंदा न करता त्याला जमेल तो धंदा तो करीत असे. अशी वहीवाट होती बलुतेदारांना आडनांवे होती.

कालांतराने सरकारने आपले सैन्याची हालचाल किंवा एखादे राज्याचे किंवा अधिकाऱ्याचे फिरतीचे वेळी बलुतेदारांची अडचण भासू नये व ते कारागीर सत्वर मिळावेत म्हणून बलूत्याचे धंदे करणारानां जमिनी इनाम दिल्या. हे बलुतेदार गांवातील इतर लोकांचीही कामे करु लागले, बलुतेदारांना वतनें मिळालेवर वतन सांभाळने करीता बलुतेदाराचा मूलगा आपले बापाचा धंदा सोडणेस तयार होईना धंदया वरुन आडनांवे पडली. व मूळची आडनांवे विसरुन गेली. धंदयावरुन वेग-वेगळे गट म्हणजे जाती पडल्या.

श्री. शंकराचार्यांनी हिंदु धर्माची पुनर्रचना करताच बौद्ध धर्माचा त्याग करुन हिंदू धर्मात आलेले लोक सामूदायिक-रित्याएकत्रित येऊन वेगवेगळया देवताचे भजन पूजन करु लागले. त्याचेही वेगवेगळे गट पडले. यावेळी रजपूत मराठा व धनगर समाजामध्ये रोटी बेटी व्यवहार ही होत होते. येथून धंदया-वरुन व वेगवेगळया गटावरुन निरनिराळया जाती निर्माण झाल्या. दळणवळणाचे अभावी, देशकाल. परिस्थिती व रुढी मुळे निरनिराळया जाती निर्माण होऊन परस्परातील रोटी बेटी व्यवहार ही बंद होत आले.

घरंदाज प्रतिष्ठीत धनगर लोकात विशेषतः हटकर म्हणजे झेंडे धनगर लोकात हाट, पाट, घाट, व साट या गोष्टी हलक्या मानल्या आहेत, हाट म्हणजे बाजार. पाट म्हणजे गंधर्व-विवाह, घाट म्हणजे पाणवठा व साठ म्हणजे चाबूक याचा अर्थ स्त्रियानी बाजारात जाणें, समाजात गंधर्व विवाह करणे, स्त्रियानी पाणवठयावर पाणी भरणेस अगर कपडे धुणेस जाणे व स्त्रियानी चाबुक हातात घेणे म्हणजे शेत काम करणे या गोष्टी हलक्या मानल्या आहेत.

महाराष्ट्रात इतर समाजापेक्षा धनगर समाजात स्त्रिया सती गेलेल्या जास्त आढळतात. वैभवशाली विजयनगरचा राजा श्रीकृष्ण देवराय याचे समवेत त्यांच्या ३ हजार राण्या सती गेल्या होत्या,

लेखक कोळेकर यांचे घराण्यात ७ स्त्रिया सती गेल्या आहेत,

**प्राचिन धनगर राज्ये**

पैठणचा राजा गौतमी पुत्र सातकर्णी इ, सन ८० ते १०४ याचे पल्लव राजाशी युद्ध झाले होते, म्हणजे भारतामध्ये पूर्वापार इसवी सनापूर्वीही धनगरांची राज्ये होती,

एकेकाळी कृष्णा नदीचे दक्षिणेकडील प्रदेशातील यादव तसेच मद्रास



प्रांतातील गहलोल कुळातील जमीनदार धनगर होते. कर्नाटकात विजयनगरचे राजे तसेच त्रावणकोर, कोचीन व पडूकोटा येथील पल्लव राजे व त्यांचे सरदार हे धनगरच होते. मालखंड, वरंगळ, म्हैसूर, कलेदि, बिदन इक्करचें पाळगार म्हणजे राजें जिजी म्हणजे कृष्णगिरीचे राजे धनगर होते. पल्लवानी कर्नाटकात एक नवे राज्य स्थापन केलें. त्याला कुरुंबानाडू असे म्हणत असत. त्यांची राज-धानी फुलाला होती. त्याचे आरमार होते, ते आपली नाणीही पाडत असत. पल्लवांचे एका शाखेनें बंगालमध्ये इसवी सन ६४३ ते ११६७ पर्यंत राज्य केले. दक्षिण भारतात पूर्व किनाऱ्यावर चोल प्रांतात कारोमांडेल किनाऱ्यावर इसवी सनाचें तिसरे शतक ते दहावें शतकात पल्लवांचे राज्य होते. त्यांची राजधानी कांची उर्फ कांजीवरम होती. या पल्लवांची राजधानी कांजीवरम येथे चिनी प्रवासी ह्यू एनेचॅग इसवी सन ६४० चे सुमारास येऊन गेला होता. कांजीवरम येथील मिनाक्षी मंदिर व इतर सुंदर इमारती पल्लव राजानी बांधल्या. पल्लव राजा शिवस्कंद वर्मा याने आश्वमेध यज्ञ केला होता. १२ वे शतकात आनंदकोम नावाचा एक धनगर आपली मेंढरे जिंजीचे किल्याजवळ चारत असता त्याला द्रव्याचा एक ठेवा सापडला ते द्रव्य खर्च करुन त्याने सैन्य उभे केले व देवानुरचे संनपुट पाळगाराचा पराभव करुन आनंदगिरी हा किल्ला बांधला. या घराण्यात इसवी सन १२०० ते १६४१ पर्यंत राज्य चालू होतें,

कर्नाटकातील बहुतेक सर्व राजे पाळेगार, सरदार देसाई, पाटील व इतर वतनदार धनगर जातीचे होते. पदुकोटाचे पल्लव राजाचे धार्मिक विधी करणारे लोक धनगर जातीचे होते. महाराष्ट्रात डंगे धनगर लोकात धार्मिक विधी कर-णारे लोक धनगरच आहेत त्रावणकोरचे आसपास धनगर समाजात धार्मिक विधी करणारे लोक धनगरच आहेत.

**राष्ट्रकूट घराणे :–** या घराण्यातील पहिला कृष्ण इ. सन ५५८ ते ७७३ यांने वेरुळ येथील कैलास मंदिर कोरविले. राष्ट्रकुटानें वेरुळ व कान्हेरी येथील लेणी व घारापुरी येथील एलेफंटा लेणी कोरविली, शिक्षणाला प्रोत्साहन दिले, या घराण्यातील वंती दुर्गं याचे राज्यकनोजपासून कन्याकुमारी पर्यंतभडोच पासून वाराणसी पर्यंत पसरले होते. तसेच लंकेचा राजाही त्याचा मांडलिक होता,

या घराण्यातील पहिला अमोलवर्षे (इ. सन ८१४ ते ८७८) याला अरे-बियाचा व्यापारी व इतिहासकार सुलेमान याने व इतर अरब इतिहासकारानी जगातील ४ प्रसिद्ध सम्राटापैकी एक मानले आहे, उरलेले ३ सम्राट १) चीनचा सम्राट, २) बगदादचा खलिफा ३) कान्स्टंटटिनोपलचा राजा कांचीवरमचे पल्लव राजाचे राज्य कृष्णाचे नदीचे दक्षिणेकडील सर्व प्रदेशावर होते.

राष्ट्रकूट व पल्लव राजे हे भारतात मोठे राजे होऊन गेले, पल्लवांचे राज्य इ. स. ८९३ नंतर व राष्ट्रकुटांचे राज्य ९६३ नंतर संपले,

कोल्हापूर जिल्हयात वळवट (वळीवडे) सध्याचे राधानगरी येथे इ. सन ५०० पर्यंत एका राष्ट्रकूट घराण्यांचे राज्य होते. पुन्हा वळवट येथे इ. सन ७६० पासून ९७३ पर्यंत राष्ट्रकूट घराण्याचे राज्य होते. वरंगळचे काकतीय राजे राष्ट्रकूट होते, हे राज्य इसवी सन १३२६ साली महमंद तुगलकानें स्वारी करुन जिंकले, राजा कपीलदेव यास ठार मारुन त्याचे मुलगे व सरदार हरीहर व बूक याना मुसलमान करुन दिल्लीत नेले,

मान नदीचे काठी माणगांव येथे चोथें शतक ते ५७३ पर्यंत राष्ट्रकूट घराण्याचे एक राज्य होते. विदर्भात राष्ट्रकुटाचें एक राज्य सहावें शतक ते दहावें शतक पर्यंत होते. मध्यप्रदेशात मान्यखेंड येथें इसवी सन ६२० ते ७१० पर्यंत राष्ट्रकुटांचें एक राज्य होते. कर्नाटकात मालखेड येथें इसवी सन ६०३ ते ९७५ पर्यंत राष्ट्रकुट घराण्याचें राज्य होते. काठेवाडात वलभीपूर पाल राजें धनगर होते. ग्वाल्हेर शिंदे यांचें वंशपरंपरागत सरनोबत शिंदे आंडनावांचें धनगर होते.

**कदंब घराणे.**

इसवी सनाचें चौथें शतक ते ११५७ पर्यंत कुंतल (गोवा) वनवासी, हनगर, उच्छंगी. येथें व कोल्हापूर जिल्हयात वळवट (वळीवडे.)म्हणजें सद्याचें राधा नगरी येथे इ. सन ५०० ते ५५० पर्यंत कदंब घराण्याचे राज्य होते. त्यांचे कुलदैवत बिराप्पा होते. कदंब राजे धनगर होते. ( भा संस्कृती को. खंड ८ व खंड २ )

**सिद घराणे**

महाराष्ट्रात जुन्नर ( जुन्नी नगर ) येथे इसवी सन १०११ ते इसवी सन १३०० पर्यंत सिद घराण्याचे राज्य होते.

**वडेर घराणे**

होयसळ विजयनगर व म्हैसूर

कर्नाटकातद्वार समुद्र येथे होयसळ धराण्याचे राज्य इसवी सन १०२२ ते १३४६ पर्यंत होते. या घराण्यातील विष्णू वर्धन या राजानें पंढरपूर येथील सध्या असलेले विठ्ठल मंदिर बांधले आहे. ( भा. सं. को. खंड २ पान १२८ )

विजयनगरचं संगम घराणे हे होयसळ घराण्याची शाखा होती. या दोन्ही



राज घराण्याचें व म्हैसूरचे राज घराण्याचे आडनांव वडेर होते म्हैसूरचे राजे हे धनगरच होते.

पल्लवंशातील कौन्डीण्य नावाचे एका धाडसी पुरुषाने इसवी सनाचे पहिले शतकात आपली जहाजे घेऊन पूर्वेकडे कंबोडीया देशात पुनान प्रांतात ( हिन्द चोन) जावून तेथील नागवंशीय राणी सोमा हिचे बरोबर युद्ध करुन तीला जिंकले. व तिचेशी विवाह केला. या वंशाचे राज्य तेथे तिसरे शतका पर्यंत होते.

दिल्लीच्या बादशहाने वरंगळ येथे विजयनगरचे राजे हरीहार व बुक याना पकडून मुसलमान करुन दिल्लीस नेले. त्याना कांही अभिष दाखवून दक्षिणेतील राज्ये जिंकणे करीता पाठविले. त्यानी दक्षिणेत आलेवर हिंदू धर्माचा स्विकार केला. व मुसलमानी सत्तेला प्रतिकार करणेसाठी १३३७ साली स्वतंत्र राज्य स्थापिले. या राज्यावर ४ घराण्यांनी राज्य केले संगम, साळु, तुळव व आरबीड या घराण्याचे साम्राज्य इ. सन १५६५ मध्ये नष्ट झाले. त्यांची एक शाखा इ. सन १६७४ पर्यंत पेनुकोंडा येथे राज्य करीत होती.

वरील सर्व राजे आपली संपत्ती प्रजेची सामाजिक प्रगती व इतर कार्यासाठी खर्च करीत असत. शारीरीक शिक्षण देणारे आखाडे असत. तिथे कुस्ती नेमबाजी, व युद्धकला यांचे शिक्षण मिळत असे. ते आपली नाणीही पाडत असत. त्याचे आरमारही होते. काकतीय राज्यात सर्व जातीचे लोका करीता मोफत अन्नछत्रे, प्रसुतीगृहे, व दवाखाने असत. प्रजा सुखी होती.

**गंगादेवी**

विजयनगर राज्याचे संस्थापक बुक यांची स्नुषा ही त्याचा पुत्र कु कंपन याची पट्टराणी होती. कंपनाने इ. सन १३६३ व १३७१ या वर्षी मथुरेवर स्वारी केली. तेव्हा ती त्याचे बरोबर होती. तिने मथुरा विजय व कंपराय चरीत्र नावाचे एक संस्कृत काव्य रचले होते.

**ओदूनतिरुमलांबा :-**

ही विजयनगरचा राजा अच्युतराव (इसवी सन १५३० ते १५४२) याची राणी ही काव्य गायिका व विद्वान होती. काव्य, नाटक, संगीत व्याकरण, तत्वज्ञान इत्यादी विषयात तीची उत्तम गती होती. तिने संस्कृत भाषेत ग्रंथ लिहीले होते. तिने कवीना व देवालयाना देणग्या दिल्या होत्या.

**राम भद्रांबा**

इने १६ वे शतकात रघुनाथ अभ्युदच नावाचे संस्कृत काव्य व विजय-

नगरचा इतिहास लिहीला आहे. या शिवाय अनेक विद्वान व राजकारणी स्त्रिया वरील धनगर राज्यात होऊन गेल्या.

स्थापत्य व शिल्पशास्त्र
दक्षिणेंचा ताजमहल.

आग्याच्या ताजमहल बांधला त्याच प्रमाणे दोलताबाद येथ औरंगजेब बादशहाचा मुलगा शहा आलम याने दिल्लीचा मकबरा ही इमारत आपली आई दिलराजबानू बेगम तथा रुबीया दुराणी हिच्या स्मरणार्थं बांधली. ही इमारत म्हणजे आग्याच्या ताजमहालाची लहान स्वरुपाची प्रतिकृती आहे. या इमारतीला दक्षिणेचा ताजमहल म्हणतात. ही वास्तु स्थापत्य शास्त्र विशारद अताउल्ला व चंपतराय यांनी बांधली. चंपतराय धनगर होता.

बीदर राज्याचे सर्व किल्ले बांधणारा बमगोंडा धनगर होता. पल्लव राजानी डोंगरातील मोठमोठे शिलाखंड बाजूला काढून त्या मध्ये २–३ मजली इमारती खोदल्या व उत्तम प्रकारचे नक्षीकाम केले. हे जगातलें मोठे आश्चर्य आहे

राष्ट्रकूट पल्लव होयसळ विजयनगरचे साम्राज्यानी भारतभूमीचें वैभव, कळसास पोहोचविलें होयसळ राजा विष्णू वर्धन यानें बेलूरचे शिल्प इसवी सन १११७ मध्ये उभारणीस प्रारंभ केला. ते काम इसवी सन ११७३ मध्ये नृसिंह राजाचे कारकिर्दीत पुरे झाले. भारताची दक्षिणभूमी म्हणजे पृथ्वीवरील शिल्पकलेचा धनगर राजानी उभारलेला स्वर्गच होय. भारतात जे कांही श्रेष्ट कर्तृत्व आहे ते सर्व धनगर राजानी उभारलेले आहें. संगीत, नृत्य, गायन, हा भारतीय संगीताचा प्राण आहे. या कलावर मनोहर संग्र राष्ट्रकूट पल्लव होयसळ नगरचे विजयनगरचे साम्राज्यानी वेरुल, बेलूर मिनाक्षी मंदिर गोपूरे या शिल्प–कृतीमध्ये साधले आहे.

**भंडार स्नेंह ऐक्य व भक्ती यांचे प्रतिक आहे.**

**कांबळा.**

एकदा शिवपार्वती भूतलावर आले, शिव ध्यानस्थ बसले. त्या जटे मध्यें रत्नें दिसली. ती पार्वतीनें काढून टाकली. शिव म्हणालें, त्याचे रक्षण करतील त्यांना धनाचे आगर म्हणजे धनगर म्हणतील. पार्वती पहाते तर त्या रत्नांची मेंढरे होऊन फिरत होती. त्यांची झाडाझूडपात अडकलेली लोकर पार्वतीनें गोळा केली. व त्याचे पिंजून सूत काढलें. शिवाने त्याचा कांबळा केला व त्यावर भस्माच्या तीन पट्ट्या काढल्या. हेच सत्व, रज व तम हे त्रिगुण आहेत



हेच त्रिगुण मूर्ती ब्रम्हा विष्णू महेश आहेत. कांबळा धारण करणाऱ्याने संतजानाप्रमाणें नियमीत वागावे असे सांगितले.

**अंबील व अन्नपूर्णा देवी**

नागव्वाचा मुलगा खेळूचे सोनालीशी लग्न झाले. सावकाराचे सुनेंने रत्न–हार चोरल्याचा आरोप सोनालीवर आनला. खेळूने कर्ज काढून हाराचे पैसे दिले. व त्या कर्जात खेळू काळोजी पाटालाच्या मेंढ्या राखू लागला. विठ्ठल बिरदेवानें साधाभोळा वेश घेतला. खांद्यावर कांबळा हातात काठी डोकीला मुंडासे गळ्यात सोन्याचा ताईत अशा वेश रुपात घेऊन काळोजीचे देणे भागविले व खेळूला मुक्त केले.

विठ्ठल बिरदेव नागव्वास भेटले. त्यानंतर नागव्वाने अतिथी म्हणून घरी–ठेवून घेतलें, पिठाची पेज ( आंबील ) करुन जेवू घातले, पेज संपली होती, नागव्वा उपाशी होती, देवाने नागव्वाला काश्याचे भांडे दिलें, हे भांडे म्हणजे अण्णपूर्णादेवी आहे, शिवाचं नांव घ्यावे, स्वच्छ भांडे चुलीवर ठेवावे आणि त्यातले अन्न पाणी प्रसाद म्हणून खावे असे सांगीतलें, नागव्वाने अंबील विठ्ठल बिरदेवानां दिली, म्हणून तृप्त होऊन त्या मोबदल्यात नागव्वाला अन्नपूर्ण भांडे म्हणजे अन्न पुरविणारे भांडे दिलें, म्हणन धनगर समाजात आंबील या अन्न पदार्थाला व काश्याचें भांडे यांना फार मोठे महत्व व पवित्रपणा आहे.

**भस्म**

ज्या लाकडाचे जळपाने पेज ( आंबील ) शिजविली होती, त्याची राख म्हणजे भस्म पवित्र समजून लोकांचे दुःख नाहीसे करणे करीता उपयोग करीत जा असे नागव्वाला सांगीतलें, या मुळेच आरेवाडी क्षेत्रालाच भस्मचा महिमा आहे. तेथे बिरदेव स्थान तेंतें भंडा–याचा महिमा आहे, आरेवाडीचे स्थान त्याग व क्षमायुक्त आहे, म्हणून नागव्वासाठी भस्माला मान दिला आहे. ( श्री. विठ्ठल देव महात्मय अध्याय ३३, ३४)

**झाडपिडी**

श्री क्षेत्र आरेवाडी येथे दरसाल झाडपिडी लोक म्हणजे ज्या लोकांना कांही आजार पीडी झालेले लोक आपली पिडा नाहीशी करुन घेणे करीता आरे–वाडीस येतात, श्री. काशिलिंग देवाची सेवा करीत राहून औषधा शिवाय पिडा–रहीत होऊन आपले गावी जातात, देवीची सेवा व भक्ती करुन अंगारा भस्म लावून पिडा नाहीशी करणारे हे एकमेव स्थान जगात दिसतें.

**बिरदेव**

ब्रम्हदेवाला विष्णू म्हणाले, की मी सनातन योनी आहे, तू बीज आहेस, आणि पेरणी करणारा म्हणजें बी रुजविणारा शिव आहे, यातील बीज शद्वातील बी. रुजविणारा शद्वातील रु व शिव म्हणजें देव हे शद्व मिळून बिरुदेव या शद्वाची उत्पत्ती आहे, ( भा, सं, कोष खंड पान ४, पान ४४२ व भाक, यान ता, २९-४-६२ ) ( लिंग पुराण )

**हत्ती कंकण उन्नी कंकग**

भगवान श्री शंकर यांचा एक मोठा भक्त उंडाळ पद्मन यानें आपले धनगर जातीचे मुलीशी एका राजकन्येशी लग्न केले. धनगर जातीचे बायकोचे वंशजाना हत्ती (सूती) कंकण धारणा करणारे व राजकन्येचें वंशजाना उन्नी ( लोकर ) कंकण असे म्हणतात, ( भा, सा, कोष, ) ही कथा हलमतपुराण या कानडी पुराणामध्ये ही आली आहे,

विश्व विख्यात कवी कुलगुरु कालीदास धनगर होता,

महाभारत कालात शाम पांडिया नावाचा एक धनगर जातीचा संत होऊन गेला,

पांडवाना युद्धात विजय मिळालेंवर त्यांनी राजसूर्य यज्ञ केला, पण तो असपल होऊ लागला, याचें कारण शाम पांडियाला यज्ञला बोलाविले, नाही, हे ध्यानी आल्यावर पांडवानी भिमाला पाठवून शाम पांशियाला बोलावून घेतलें, नंतर यज्ञ सिद्धीस गेला,

**गंगम**

कर्नाटकात गंग नावची धनगर लोकांची एक देवता आहें, तिला जल-देवता व गंगाभागीरथी असेही म्हणतात, भगवान श्री शंकराच्या बायका तीन पार्वती, गंगा, गौरी ( भा, सं को, श, ) पैकी गां ही गंगम देवता असावी, महाराष्ट्रात विरुदेवाचें देवळात भागूवाई नांवाची एक देवता असते ही देवीच कर्नाटकातील गंगम देवता असावी,

**कनकदास**

संत कनकदास उर्फ तिमाप्पा ही हा कानडी संत व कवी महाराष्ट्रांतील संत तुकारांम महारांज याचें तोडीचा होऊन गेला, तिम्माप्पा एकदा जमीन खोदत असता त्याला सोन्याचा मोठा ठेवा सापडला म्हणून लोक तिमाप्पा



कनकदास म्हणू लागले. तिम्मापाचा जन्म धारवाड जवळील बाड गावी इ. सनाचें १६ व्या शतकाचें आरंभी झाला. तिम्माप्पाचे वडील बिराप्पा हे विजयनगर येथे मोठे सरदार होते. कनकदासानें ते द्रव्य खर्च करुन कागीनेले गांवी श्रीकृष्ण मंदिर बांधले. आपली सर्व इस्टेट ब्राम्हणाना दान दिली. व भक्ती मार्गाला लागला. कनकदास एकदा तिरुपतीला गेला असता तो मागास जातीचा म्हणून तेथील महंताने देवळात प्रवेश दिला नाही. तेव्हा कनकदास देवळाचे पाठी मागे जावून भजन करु लागला. त्यावेळी देवाचे तोंड पाठीमागे फिरले ते पाहून महंताने देवळात प्रवेश नाकारले बाबत कनकदासाची माफी मागितली.

**अहिल्यादेवी होळकर.**

पुण्यश्लोक श्री अहिल्यादेवी होळकर यानी भारतामध्ये नद्याना घाट, धर्मशाळा, तलाव, विहीरी, देवळे, अन्नछात्रें घातली. त्यांचे खर्चाची व्यवस्था केली. सर्व जातीच्या व धर्माच्या लोकांना समानतेनें वागविले. प्रजेंला सुखी केले. इतर धर्मांचे देवालयाना देणग्या दिल्या. पुष्कळ दानधर्म केला. औरं-गजेंब बादशहाने पाडून टाकलेले काशी विश्वनाथ मंदिर व महंमद गजनी यानी पाडून टाकलेले सोरटी सोमनाथ मंदिर पुन्हा बांधले असा धार्मीक व सुशिल वृत्तीचा कुणी राजा अगर राणी यापूर्वी भारतात झाले नाहीत.

हे पुस्तक लिहीताना प्राध्यापक आदिनाथ कल्लप्पा कुरुंदवाडे राहणार लाट यांनी मला संदर्भ ग्रंथ पुरविले याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहे. या पुस्तकाबद्दल काही इनाम द्यावयाचे असल्यास माझ्याकडे द्यावे व माझे पश्चात ते माझा मुलगा शिवाजी गणपतराव कोळेकर यास द्यावे.

धनगर समाजाचे गोत्र वंश कुळी व प्रवर व इतिहास याला आधार भूत ग्रंथ मराठा क्षत्रियाचा इतिहास भाग १ ते ३ भारतीय संस्कृती कोष भाग १ ते १० ऋग्वेद यर्जेवेद, सामवेद, अर्थवबेद, १८ महापुराणे मूळ स्तंभ हमारा समाज भारतके मेशपाल विठ्ठल बिरदेव महात्म्य कानडी हलमंतपुराण चारी वेदाते संस्कृत भाषांतर व वैदीक ग्रंथावरील भाष्य ही आहेत. विजय-नगरचा राजा बुक यांने आपला मंत्री सायन्नाचार्य कडून ही भाषें लिहून घेतली सध्या भारतात हीच भाषें प्रचलित आहेत.

मी भेट दिलेली ग्रंथालये :– शिवाजी विद्यापीठ नगरवाचनालय कोल्हापूर विलींग्डन कॉलेज, जिल्हा वाचनालय, सांगली. भारत इतिहास संशोधन मंडळ पुणें,

तसेच कोल्हापूरचे सरकारी मोडी रेकार्ड, पटवर्धनाचे रेकार्ड, सातारा दप्तर पेशवे दप्तर पुणें व आपटे वाचन मंदिर, इचलकरंजी ही आहेत.

